**महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशिक्षण शाखा) या संवर्गातील अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था या पदावरील अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-पकास-२४१७/प्र.क्र.३०३/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:-११ ऑक्टोबर, २०१८

**वाचा** :-१) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि. २९.०२.२०१६
२) सामान्य प्रशासन विभाग शासन पूरक पत्र क्र.परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.०३.०४.२०१७
३) शा.शि. व क्री. वि.शासन निर्णय क्र. एसएटी-०८१२/प्र.क्र.३५३/प्रशा-२,दि. ३०.०१.२०१३
४)शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, अधिसूचना क्र एसएओ-१०११/प्र.क्र.३९/प्रशा-२दि. २६.०२.२०१८
५)आयुक्त शिक्षण यांचे पत्र क्र. आशिका/परिविक्षा २०१७/आस्था-अ/१०५/२२४५/ दि. १९.४.२०१८
६)आयुक्त शिक्षण यांचे पत्र क्र. आशिका/परिविक्षा २०१७/आस्था-अ/१०५/३०८२/दि. १४.०६.२०१८

**प्रस्तावना**:-

वाचा ३ येथे नमूद दिनांक ३०.०१.२०१३ च्या शासन निणयान्वये सरळसेवेने महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांची महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशिक्षण शाखा) गट-ब संवर्गात अधिव्याख्याता या पदावर २ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती करण्यात आली आहे. महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ व गट-ब (शिक्षण सक्षमीकरण शाखा-पूर्वीची शिक्षक प्रशिक्षण शाखा) या संवर्गात नियुक्त अधिकाऱ्यांसाठी विभागीय परीक्षा घेण्यात आली नाही. त्यामुळे या अधिकाऱ्यांच्या वेतनवाढी थांबलेल्या आहेत. परिणामी या सर्व अधिकाऱ्यांचा परीविक्षाधीन कालावधी समाप्त करणे, नियुक्त्या पुढे चालू ठेवणे, वेतनवाढी नियमित करणे, ज्येष्ठतासूची तयार करणे इत्यादी सेवाविषयक बाबीही प्रलंबित आहेत. आयुक्त (शिक्षण) यांच्या दिनांक १९.०४.२०१८ च्या पत्रान्वये परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या दिनांक २६.०२.२०१८ रोजीच्या अधिसूचनेद्वारे “महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा)” संवर्गातील प्राचार्य गट-अ, ज्येष्ठ अधिव्याख्यता गट-अ व अधिव्याख्याता गट-ब या पदांसाठी विभागीय परीक्षेचे विनियमन करणारे नियम २०१८ प्रसिध्द करण्यात आले आहेत. त्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून विभागीय परीक्षेचे आयोजन करण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :

सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दिनांक २९.०२.२०१६ व पुरकपत्र दिनांक ०३.०४.२०१७ नुसार अटींची पूर्तता करणाऱ्या, उपरोक्त वाचा ३ येथे नमूद दिनांक ३०.०१.२०१३ च्या शासन निणयान्वये सरळसेवेने महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशिक्षण शाखा) गट-ब संवर्गात अधिव्याख्याता या पदावर सोबतच्या प्रपत्र-अ मध्ये नमूद अधिकाऱ्यांचा त्यांच्या नावासमोर रकाना क्र. ७ मध्ये नमूद दिनांकास परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्यात येत असून रकाना क्र. ८ मध्ये नमूद दिनांकास त्यांची सेवा पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. परिविक्षाधीन पूर्ण करणाऱ्या अधिकाऱ्यांना वार्षिक वेतनवाढी देण्यात याव्यात.

३. महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा)" संवर्गातील प्राचार्य गट-अ, ज्येष्ठ अधिव्याख्यता गट-अ व अधिव्याख्याता गट-ब या पदांसाठी विभागीय परीक्षा नियम २०१८ अन्वये विहित केलेली विभागीय परीक्षा विहित संधीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१११२२९०४१५२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Basaveshwar Mamadapure

Digitally signed by Santosh Basaveshwar Mamadapure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, serialNumber=557abe7a7194ec5ddc74df537d7d57a9dbda20b1937a2e41983c35f6a38b6ad8, cn=Santosh Basaveshwar Mamadapure
Date: 2018.10.15 12:00:56 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे (विद्या प्राधिकरण)
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४) संबंधित प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सात्तत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था.
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६) संबंधित अधिकारी ( संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद ( विद्या प्राधिकरण) पुणे यांचे कार्यालया मार्फत)
७) निवडनस्ती

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक पकास-२४१७/प्र.क्र.३०३/प्रशा-२, दिनांक ११.१०.२०१८ सोबतचे प्रपत्र-अ**

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | शासन सेवेत नियुक्तीच्या आदेशाचा दिनांक | शासन सेवेत प्रथम रुजू झाल्याचा दिनांक | रकाना ४ मधील दिनांकानुसार परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीत घेतलेल्या एकूण अर्जित/परिवर्तीत रजा इ. एकूण कालावधी | रकाना ६ मधील कारणांमुळे वाढलेला परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक पूर्ण केल्यामुळे शासन सेवा ज्या दिनांकापासून पुढे चालु ठेवावयाची आहे तो दिनांक. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १. | श्री. शिवशंकर वामन मोरे, | शा.शि.व क्री.वि. शा.नि.क्र.एसएटी-०८१२/प्र.क्र.३५३/प्रशा-२, दि.३०.०१.२०१३ | ०७.०२.२०१३ | ०६.०२.२०१५ | निरंक | ०६.०२.२०१५ | ०७.०२.२०१५ |
| २. | श्री. घनशाम विठ्ठल पौल. | शा.शि.व क्री.वि. शा.नि.क्र.एसएटी-०८१२/प्र.क्र.३५३/प्रशा-२, दि.३०.०१.२०१३ | २७.०२.२०१३ | २६.०२.२०१५ | १६ दिवस | १५.०३.२०१५ | १६.०३.२०१५ |
| ३. | श्री. इमाम मिर्झा नझिर, | शा.शि.व क्री.वि. शा.नि.क्र.एसएटी-०८१२/प्र.क्र.३५३/प्रशा-२, दि.३०.०१.२०१३ | १२.०४.२०१३ | ११.०४.२०१५ | निरंक | ११.०४.२०१५ | १२.०४.२०१५ |
| ४. | श्री. राजेश आत्माराम गवई, | शा.शि.व क्री.वि. शा.नि.क्र.एसएटी-०८१२/प्र.क्र.३५३/प्रशा-२, दि.३०.०१.२०१३ | ०१.०२.२०१३ | ३१.०१.२०१५ | निरंक | ३१.०१.२०१५ | ०१.०२.२०१५ |
| ५. | श्रीमती ज्योत्स्ना श्रीराम धुतमल | शा.शि.व क्री.वि. शा.नि.क्र.एसएटी-०८१२/प्र.क्र.३५३/प्रशा-२, दि.३०.०१.२०१३ | ०१.०२.२०१३ | ०६.०२.२०१५ | २०२ दिवस | २१.०८.२०१५ | २२.०८.२०१५ |

Santosh Basaveshwar Mamadapure

Digitally signed by Santosh Basaveshwar Mamadapure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, serialNumber=557abe7a7194ec5ddc74df537d757a9dbda20b1937a2e41983c35f6a38b6ad8, cn=Santosh Basaveshwar Mamadapure
Date: 2018.10.15 12:01:59 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन